आदिवासी उपयोजना क्षेत्रातील/आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील दारिद्रय रेषेखालील आदिवासी शेतकऱ्यांना शेतीसाठी अर्थसहाय्य देण्याची योजना सन २०१५-१६ मध्ये राबविण्यासाठी प्रशासकिय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.....

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः आउयो-२४१५/प्र.क्र.२१७/४ अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: ५ जून, २०१५

वाचा

१) **शासन निर्णय क्रमांकः आदिवासी विकास विभाग-क्र.बियुडी-२०१५/प्र.क्र.११/का-६, दि. २६ मे, २०१५,**

प्रस्तावना

आदिवासी उपयोजना क्षेत्रातील / आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील दारिद्रय रेषेखालील आदिवासी शेतकऱ्यांना अर्थसहाय्य देण्याची योजना कृषि विभागामार्फत सन १९९३-९४ पासून राज्यामध्ये राबविण्यात येत आहे. ही योजना राबविण्यासाठी आदिवासी विकास विभागाकडून निधी उपलब्ध करून देण्यात येतो.

आदिवासी विकास विभागाने संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सदर योजना सन २०१५-१६ मध्ये राबविण्यासाठी आदिवासी उपयोजना क्षेत्रातील आदिवासी शेतकऱ्यांना दारिद्रय रेषेवर आणण्यासाठी अर्थसहाय्य या योजनेसाठी रू. ५५३८.२८ लाख (रूपये पंचावन्न कोटी अडतीस लाख अठ्ठावीस हजार फक्त) तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्रातील आदिवासी शेतकऱ्यांना फलोत्पादन व इतर पिकांसाठी तुषार व ठिबक सिंचन या योजनेसाठी रू. १३.५८ लाख (रू.तेरा लाख अठ्ठावन्न हजार फक्त) असा एकूण रू. ५५५१.८६ लाख (रू. पंचावन्न कोटी एकावन्न लाख शहाऐंशी हजार फक्त) निधी (टिएसपी:- लेखाशीर्ष (२४०१ २१८४) अंतर्गत उपलब्ध करून दिला आहे.

त्याचप्रमाणे, आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील आदिवासी शेतकऱ्यांना दारिद्रय रेषेवर आणण्यासाठी अर्थसहाय्य या योजनेसाठी रू. १९३४.१६ लाख (रू. एकोणीस कोटी चवतीस लाख सोळा हजार फक्त) तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील आदिवासी शेतकऱ्यांना फलोत्पादन व इतर पिकांसाठी तुषार व ठिबक सिंचन या योजनेसाठी रू. १५.१४ लाख (रूपये पंधरा लाख चौदा हजार फक्त) असा एकूण रू.१९४९.३० लाख (रू. एकोणीस कोटी एकोणपन्नास लाख तीस हजार फक्त) एवढा निधी ओटिएसपी:-लेखाशीर्ष (२४०१ १९६५) अंतर्गत उपलब्ध करून दिला आहे.

याप्रमाणे,आदिवासी विकास विभागाने टिएसपी व ओटिएसपीसाठी एकूण रू. ७५०१.१६ लाख (रुपये पंचाहत्तर कोटी एक लाख सोळा हजार फक्त) एवढी तरतूद केली आहे. त्यास अनुसरुन सन २०१५-१६ मध्ये आदिवासी उपयोजना राबविण्यासाठी रू. ७५०१.१६ लाख (रुपये पंचाहत्तर कोटी एक लाख सोळा हजार फक्त) एवढया निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

आदिवासी क्षेत्र उपयोजना/ आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना अंतर्गत सन २०१५-१६ मध्ये आदिवासी उपयोजना क्षेत्रातील आदिवासी शेतकऱ्यांना दारिद्रय रेषेवर आणण्यासाठी अर्थसहाय्य या योजनेसाठी रू. ५५३८.२८ लाख (रूपये पंचावन्न कोटी अडतीस लाख अठ्ठावीस हजार फक्त) तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्रातील आदिवासी शेतकऱ्यांना फलोत्पादन व इतर पिकांसाठी तुषार व ठिबक सिंचन या योजनेसाठी रू. १३.५८ लाख (रू.तेरा लाख अठ्ठावन्न हजार फक्त) असा एकूण रू. ५५५१.८६ लाख (रू. पंचावन्न कोटी एकावन्न लाख शहाऐंशी हजार फक्त) व आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील आदिवासी शेतकऱ्यांना दारिद्रय रेषेवर आणण्यासाठी अर्थसहाय्य या योजनेसाठी रू. १९३४.१६ लाख (रू. एकोणीस कोटी चौतीस लाख सोळा हजार फक्त) तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील आदिवासी शेतकऱ्यांना फलोत्पादन व इतर पिकांसाठी तुषार व ठिबक सिंचन या योजनेसाठी रू. १५.१४ लाख (रूपये पंधरा लाख चौदा हजार फक्त) असा एकूण रू.१९४९.३० लाख (रू. एकोणीस कोटी एकोणपन्नास लाख तीस हजार फक्त) याप्रमाणे आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील उपयोजनांसाठी एकूण रू. ७५०१.१६ लाख (रुपये पंचाहत्तर कोटी एक लाख सोळा हजार फक्त) एवढया निधीच्या कार्यक्रमास शासनाची प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. आदिवासी विकास विभागाने त्यांच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी फक्त शासन निर्णयासोबतच्या जिल्ह्यांसाठीच खर्च करण्यात यावा.

३. आदिवासी विकास विभागाने सदर तरतुदीपैकी सन २०१५-१६ या चालु आर्थिक संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या कॅशफ्लोप्रमाणे खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. त्यापुढील खर्च आदिवासी विकास विभाग जसा जसा निधी संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देईल त्याप्रमाणे खर्च करण्यात यावा.

५. आदिवासी विकास विभागाच्या दि.१६ डिसेंबर, २००९ च्या शासन निर्णयाद्वारे जिल्हास्तरीय योजना जिल्हाधिकारी यांचेकडे राबविण्यासाठी देण्यात आली असून योजनेच्या मंजूर तरतुदीनुषंगाने संबंधित जिल्हाधिकारी यांनी कार्यवाही करावयाची आहे.

६. सदर योजनेंतर्गत नविन विहिर, जमिन सुधारणा, निविष्ठा पुरवठा, पिक संरक्षण औजारे/शेतीची सुधारित औजारे, बैलगाडी, बैलजोडी/रेडेजोडी, इनवेल बोअरिंग, जुनी विहिर दुरुस्ती, पाईप लाईन, पंपसेट, शेततळे, परसबाग, ठिबक/तुषार सिंचन संच अशा एकूण १३ घटकांचा समावेश असून त्याकरिता बाबनिहाय अनुदान परिशिष्ट (एक) नुसार अनुज्ञेय राहणार आहे. परिशिष्ट (एक) मधील कार्यक्रम परिशिष्ट (दोन)मध्ये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार राबविण्यास शासन मान्यता देत आहे. तसेच उपरोक्त योजना राबविताना परिशिष्ट (तीन) मधील कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी सविस्तर मार्गदर्शक सूचना कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे यांनी निर्गमित कराव्यात या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी पुढील प्रमुख बाबी अंतर्भूत करण्याची दक्षता घेण्यात यावी.

i) प्रत्येक जिल्हयांचा विस्तार व फलोत्पादन विकास आराखडा तयार करण्यात येत आहे, त्यामध्ये या योजनेचा गरजेनुरुप अंतर्भाव करण्यात यावा.

ii) या योजनेचे मूल्यमापन त्रयस्थ यंत्रणेकडून (Third party evaluation) करुन घ्यावे.

iii) वैयक्तीक लाभार्थी निवडतांना महिला लाभार्थीना प्राधान्य देण्यात यावे.

iv) वैयक्तिक लाभ दिलेल्या लाभधारकांची यादी जिल्हापरिषद, तालुका कार्यालय, पंचायत समिती कार्यालय, जिल्हाधिकारी कार्यालय व प्रकल्प अधिकारी कार्यालयात लावण्यात यावी तसेच कृषि विभागाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात यावी.

८. या योजनेवरील खर्च सन २०१५-१६ करिता खालील लेखाशीर्षांतर्गत मंजूर असलेल्या तरतूदींतून भागविण्यात यावा.

**लेखाशीर्ष:-**

१) मागणी क्रमांक टी-५

२४०१ पीक संवर्धन
पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना
७९६ -जनजाती क्षेत्र उपयोजना
(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना
राज्य योजनांतर्गत योजना
(०१)(०२) कृषि विकास विषयक विविध कार्यक्रम
(जिल्हास्तर योजना)
(२४०१ २१८४) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (एकूण रू. ५५५१.८६ लाख)

२) मागणी क्रमांक टी-५

२४०१ पीक संवर्धन
पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना
७९६ -जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना
राज्य योजनांतर्गत योजना
(०२) (०२)शेतीकरिता मशागत सामग्रीचे वितरण/ क्षेत्रीय सुधारित अवजारे व उपकरणे
(जिल्हास्तर योजना)
(२४०१ १९६५) ३३ अर्थसहाय्य (एकूण रू. १९४९.३० लाख)

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०५१३००४२०८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umesh Madhukar Madan

Digitally signed by Umesh Madhukar Madan
DN: CN = Umesh Madhukar Madan, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretory
Date: 2015.06.05 13:02:41 +05'30'

**(उ.म.मदन)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त कृषि , महाराष्ट राज्य पुणे.
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, पुणे (१० प्रतीसह)
३. सर्व विभागीय आयुक्त,
४. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
५. सर्व संचालक/सहसंचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
६. सर्व विभागीय कृषि सह संचालक
७. अतिरिक्त आयुक्त, आदिवासी विकास विभाग, नाशिक/नागपूर/ठाणे/अमरावती,
८. सर्व आदिवासी विकास उपआयुक्त,
९. सर्व जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन विकास मंडळ,
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व आदिवासी उप आयुक्त,
११. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
१२. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाबीज, अकोला,
१५. सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
१६. महासंचालक माहिती व जनसंपर्क सचालनालय,मुंबई.
१७. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१८. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई /नागपूर
१९. सर्व सहसचिव/उपसचिव/अवरसचिव/कार्यासन अधिकारी, (कृषि) कृषि व पदुम विभाग
२०. ग्रामविकास व जलसंधारण विभाग मंत्रालय मुंबई ३२
२१. वित्त विभाग व्यय १/अर्थसंकल्प १३, मंत्रालय, मुंबई -३२
२२. नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई - ३२,
२३. आदिवासी विकास विभाग,
२४. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,
२५. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२६. निवड नस्ती.

**शासन निर्णय क्र.आऊयो२४१५/प्र.क्र.२१७/४अे, दिनांक ५ जून, २०१५ चे**

**परिशिष्ठ-एक**

**दारिद्रय रेषेखालील आदिवासी उपयोजने अंतर्गत आदिवासी क्षेत्रातील/आदिवासी क्षेत्राबाहेरील शेतक-यांना कृषि विकासासाठी अर्थसहाय्य देण्याची योजना**

**सन २०१५-१६ मध्ये राबविण्याकरिता खालीलप्रमाणे सुधारित बाबनिहाय अनुदान देय राहील.**

| अ. क्र | बाब | अनुदानाची टक्केवारी | अनुदान मर्यादा रुपये |
|---|---|---|---|
| १ | जमीन सुधारणा (१ हेक्टर मर्यादेत) | १०० | मृद संधारण निकषानुसार रु.४०,०००/- |
| २ | प्रात्यक्षिकासाठी निविष्ठा वाटप (१ हेक्टर मर्यादेत) | १०० | रु.५०००/-च्या मर्यादेत |
| ३ | पीक संरक्षण/शेतीची सुधारित अवजारे | १०० | रु.१०,०००/- च्या मर्यादेत |
| ४ | बैलजोडी/ रेडेजोडी | १०० | रु. ३०,०००/-या मर्यादेत |
| ५ | बैलगाडी | १०० | रु. १५,०००/-च्या मर्यादेत |
| ६ | जुनी विहिर दुरुस्ती | १०० | रु.३०,०००/- च्या मर्यादेत |
| ७ | इनवेल बोअरिंग | १०० | रु.२०,०००/- च्या मर्यादेत नाबार्डच्या निकषानुसार |
| ८ | पाईप लाईन | १०० | ३०० मीटरपर्यंत नाबार्डच्या निकषानुसार २०,०००/- च्या मर्यादेत |
| ९ | पं ासंच | १०० | रु.२०,०००/- च्या मर्यादेत |
| १० | नवीन विहीर | १०० | रु. ७०,०००/- ते रु.१,००,०००/- च्या मर्यादेत रोहयो अंतर्गत जवाहर योजने नुसार) |
| ११ | शेततळे | १०० | रु.३५,०००/- मृदसंधारण निकषानुसार |
| १२ | परसबाग कार्यक्रम (फ़लोत्पादन विभागाच्या निकषानुसार) | १०० | रु.२००/- प्रती लाभार्थी |
| १३ | तुषार/ ठिबक सिंचनसंच पुरवठा | १०० | रु. २५,०००/- प्रती हेक्टर च्या मर्यादेत |

## शासन निर्णय क्र.आऊयो २४१५/प्र.क्र.२१७ /४अे, दिनांक ५ जून, २०१५ चे
## परिशिष्ठ-दोन

**दारिद्रय रेषेखालील आदिवासी उपयोजने अंतर्गत आदिवासी क्षेत्रातील/आदिवासी क्षेत्राबाहेरील शेतक-यांना कृषि विकासासाठी अर्थसहाय्य देण्याची योजना**

**१. जमीन सुधारणा:-**

जमीन सुधारणा करण्यासाठी रु.४०,०००/- च्या मर्यादेत एक हेक्टरपर्यंत १०० टक्के अनुदान किंवा ग्राम विकास व जल संधारण विभागाने निश्चित केलेल्या निकषानुसार १०० टक्के अनुदान देय राहील. या बाबी अंतर्गत नवीन भात खाचरे, कर्पाटमेंट बंडींग, समतळ चर इ. या घटकाला लाभ देता येईल. लाभार्थ्यांच्या गरजेनुसार घटक निश्चित करुन लाभ देण्यांत यावा.

मृद संधारण विषयक खर्चाचे मापदंड त्या विभागाच्या मान्य असलेल्या मापदंडानुसार राहतील. मृद संधारण विभागाच्या वरील बाबींच्या खर्चाच्या मापदंडामध्ये वेळोवेळी जे बदल करण्यांत येतील ते योजनांकरिता लागू राहतील. जमीन सुधारणा या बाबीकरिता रु.४०,०००/- पेक्षा जादा येणारा खर्च लाभार्थ्याने स्वत: सोसावयाचा आहे.

**२. प्रात्यक्षिकांसाठी निविष्ठा पुरवठा:-**

निविष्ठा पुरवठयाकरिता रक्कम रु.५०००/- पर्यंत १०० टक्के अनुदान उपलब्ध राहील. या बाबींमध्ये शेतकऱ्यांना फक्त बियाणे खते व पीक संरक्षण औषधी यांचा पुरवठा क रण्यात यावा.

निविष्ठांचा पुरवठा करतांना भौगोलिक परिस्थितीचा अभ्यास करुन त्या भागात होणाऱ्या प्रचलित पिकांच्या बियाण्याचे संकरीत / सुधारित / अधिक उत्पादन देणारे वाण यांचा पुरवठा करावयाचा आहे. पिक उत्पादन आराखडयाप्रमाणे निविष्ठा वाटपाचा आराखडा तयार करण्यात यावा व त्याप्रमाणे निविष्ठाचा पुरवठा खरीप हंगामापूर्वी करण्यात यावा.

जैविक औषधे / रासायनिक खते खरेदी प्रक्रियेकरिता राज्यस्तरावरील दर निश्चिती समितीचे दरानुसार तसेच मा. संचालक (नि. व गु.नि.) यांच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करावी. रासायनिक खतांची खरेदी महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ यांच्यामार्फत करणेत यावी. बियाणांची खरेदी महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ / कृषि विद्यापीठे यांचेकडून करण्यात यावी. निविष्ठांचा पुरवठा हंगामापूर्वी वेळेत करणेत यावा. निविष्ठा पुरवठा हा एक हेक्टर क्षेत्राच्या मर्यादेत करण्यांत यावा. या घटकाचा लाभ खरीप / रब्बी व उन्हाळी या तिन्ही हंगामात अथवा एकाच हंगामात देता येईल मात्र या बाबीकरिता कमाल मर्यादेपेक्षा अधिकचे अनुदान देय राहणार नाही. खरेदी संदर्भात राज्य पातळीवरील दरनिश्चिती समिती व कृषि संचालक (गुणवत्ता नियंत्रण) यांनी दिलेल्या सूचनेनुसार खरेदी करण्यात यावी. शेतकऱ्यांना जास्तीत जास्त माहिती देवून एकात्मिक किड व्यवस्थापनेसाठी प्रवृत्त करण्यात यावे.

**३. पिक संरक्षण / शेतीची सुधारित अवजारे:-**

या बाबी अंतर्गत शेतीची सुधारित अवजारे यांचा शासन मान्य दराने व शेतकऱ्यांच्या मागणीप्रमाणे पुरवठा करण्यात यावा. यासाठी अनुदान रक्कम रुपये १०,०००/- पर्यंत १००% अनुदानावर देय राहील.

विविध योजनां च्या माध्यमातून गरजू शेतकऱ्यांना या बाबींवर लाभ देतांना शेतकऱ्यांस कोणत्या अवजारांची गरज आहे हे त्यांच्याकडून जाणून घेऊन त्याच्या गरजेनुसारच अवजारांचा पुरवठा करण्यात यावा. या औजारांची खरेदी शासनाने तसेच संचालक (नि. व गु. नि.) यांच्या मार्गदर्शक सूचना या बाबत निर्गमित केलेले शासन निर्णय / मार्गदर्शक सूचनेनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. **बैलजोडी / रेडेजोडी:-**

बैलजोडी / रेडेजोडी करिता रु.३०,०००/- मर्यादेत १०० टक्के अनुदान उपलब्ध राहील. बैलजोडी / रेडेजोडी यांचा पुरवठा लाभार्थ्यांना गरजेनुरुप करावा. बैलजोडीची खरेदी नियमित जनावरांच्या बाजारात लाभार्थ्यांच्या संमतीनुसार, पशुवैद्यकीय अधिकारी, जिल्हा कृषि अधिकारी (विघयो), जिल्हा परिषद व कृषि अधिकारी (विघयो) यांच्या उपस्थितीत करावी. बैलजोडी सुदृढ व शेती कामात योग्य असल्याबाबत पशुवैद्यकीय अधिकाऱ्यांकडून प्रमाणपत्र घेण्यांत यावे. खरेदीचा व्यवहार झाल्यानंतर बैलजोडीचा विमा उतरविण्यात यावा व निशाणी म्हणून टॅटुईग करुन (गोंदवून) घ्यावे. तसेच लाभार्थीचा बैलजोडी समवेत पोस्टकार्ड साईजचा फोटो काढावा व सदर फोटो संबंधित अधिकाऱ्याकडे तपासणीचे वेळेस उपलब्ध करुन द्यावेत. ज्या लाभार्थ्यांकडे सद्य:स्थितीत बैलजोडी आहे अशा लाभार्थ्यांना बैलजोडी / रेडेजोडीचा लाभ देऊ नये. बैल जोडी / रेडे जोडी खरेदी प्रक्रिया नियमित स्थानिक जनावरांच्या बाजारात लाभार्थीच्या संमतीनुसार पशुवैद्यकीय अधिकारी, जिल्हा कृषि अधिकारी (विघयो), जिल्हा परिषद व तालुका पातळीवर, कृषि अधिकारी (विघयो), तालुका पंचायत समिती यांच्या उपस्थितीत करण्यात यावी. याबाबतची सविस्तर सूचना संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी निर्गमित कराव्यात.

५. **बैलगाडी:-**

बैलगाडीच्या प्रचलित किंमतीच्या १०० टक्के जास्तीत जास्त रु.१५,०००/- मर्यादेत राहील. उर्वरित रक्कम बँकेकडून कर्ज रुपाने पुरविण्यात यावी अथवा लाभार्थ्यांना स्वत: उभारावी. बैलगाडीची खरेदी कृषि विभागाचे दर निश्चिती समितीने मान्यता दिलेल्या दराने व शासनाच्या सूचनांनुसार व कृषि संचालक (नि व गु.नि.) यांच्या परिपत्रकानुसार करण्यात यावी. बैलगाडीचा पुरवठा केल्यानंतर बैलगाडीवर दर्शनी भागावर आदिवासी उपयोजना या योजनेतंर्गत पुरवठा व पुरवठा केल्याचे वर्ष असे ३X२ इंच आकाराचे पत्र्याचे लेबल लावावे अथवा लकूड असलेल्या भागावर कोरुन घ्यावे.

६ **जुनी विहिर दुरुस्ती:-**

या बाबी अंतर्गत नाबार्डने निर्धारित केलेल्या निकषांच्या आधारे १०० टक्के म्हणजेच रु ३००००/- अनुदान देय राहील. उर्वरीत रक्कम लाभार्थीने कर्जरुपाने अथवा स्वत: उभी करावयाची आहे. लाभार्थ्याकडे असलेल्या जुन्या विहिरींची कामें करतांना अंदाजपत्रक तयार करुन उप अभियंत्याकडुन तांत्रिक मान्यता घेण्यांत यावी. जिल्हा कृषि अधिकारी (विघयो) पंचायत समिती यांनी झालेल्या कामाच्या मोजमापानुसार खर्चाचे प्रमाणात अनुदानाचा लाभ देण्यात यावा. या बाबींकरीता नाबार्ड कडुन याबाबतच्या निकषात वेळोवेळी जे बदल करण्यांत येतील ते बदल या योजने करीता लागु राहतील.

७ **इनवेल बोअरींग:-**

या बाबीचा लाभ १०० टक्के अनुदानावर नाबार्डने निर्धारित केलेल्या खर्चाच्या प्रमाणकाप्रमाणे रु २०,०००/- देय राहील. इनवेल बोअरींगचे काम करतांना खर्चाचे अंदाजपत्रक तयार

करुन त्यास उप अभियंत्याची तांत्रीक मान्यता घेण्यांत यावी. कृषि अधिकारी (विघयो) यांनी झालेल्या कामाची मोजमापे घेऊन अनुदानाचा लाभ देणेंत यावा.

नाबार्डचे प्रचलित नियमानुसार या बाबीकरीता खर्चाची प्रमाणके रु. २००/- प्रतिमिटर व रु. ५००/- दोन मीटर केसींग पाईप करीता आहेत. नाबार्ड कडुन याबाबतच्या निकषामध्ये वेळोवेळी करण्यांत येणा-या सुधारणा या योजनेकरीता लागू राहतील. इनवेल बोअरींग कोणत्या पध्दतीने घ्यावे, याबाबतचा निर्णय जिल्हास्तरावर घेण्यात यावा. लाभार्थीची जुनी विहिर अथवा इनवेल बोअरिंग या बाबीपैकी त्यांच्या मागणीनुसार एकाच बाबीचा लाभ देण्यात येईल.

**८ पाईप लाईन:-**

या बाबी अंतर्गत लाभार्थीस जास्तीत जास्त ३०० मीटर पर्यत लाभ देता येईल. यासाठी नाबार्डने निर्धारित केलेल्या खर्चाच्या प्रमाणकाच्या १०० टक्के अनुदान देय राहील. या करीता रु.२००००/- च्या मर्यादेत अनुदान उपलब्ध राहील शेतक-यांना योग्य गुणवत्तेचे पाईप उपलब्ध व्हावेत म्हणुन आयएसआय मार्क असलेल्याच पाईपची खरेदी करण्यांत येईल. यामध्ये पाईप लाईनची प्रत्यक्ष किंमत किंवा रु.२०,०००/- यापैकी जे कमी असेल तेवढेच अनुदान देय राहील.

**९ पंपसंच:-**

"विद्युत पंपसंच तसेच ऑईल इंजिन करीता रक्कम रू.२०,०००/- च्या मर्यादेत अनुदान उपलब्ध राहील. सदर निकषांप्रमाणे १००% अनुदान देय राहील. या बाबी अंतर्गत विद्युत पंपसंच त्याचप्रमाणे ऑईल इंजिन यांचा लाभ देता येईल. यामध्ये पंपसंचाची प्रत्यक्ष किंमत किंवा रू.२०,०००/- यापैकी जे कमी असेल तेवढेच अनुदान देय राहील."

**१० नवीन विहीर:-**

या घटकासाठी लाभार्थीस रु ७०,०००/- ते रु १०००००/- अनुदान देय राहील

या योजनेअंतर्गत जे लाभार्थी नवीन विहीर या योजनेचा लाभ घेणार आहेत त्यांच्यासाठी या योजनेअंतर्गत अनुदानाची कमाल मर्यादा रुपये १,००,०००/- इतकी राहील व जे लाभार्थी नवीन विहीर या घटकाचा लाभ घेणार नाही त्यांच्यासाठी अनुदानाची मर्यादा रु ५०,०००/- राहील. नवीन विहिर या घटकासाठी अनुदानाची मर्यादा रु.१,००,०००/- असली तरी विहिर खोदाईसाठी प्रत्यक्ष खर्च कमी झाल्यास खर्चाच्या मर्यादे इतकेच अनुदान त्याला देय असेल. लाभार्थीस अनुदान देताना भूस्तरीय रचना व अंदाज पत्रकातील घटकानुसार झालेल्या प्रत्यक्ष कामाचे मोजमापानुसार अनुदान अदा करावे.

**११. शेततळे:-**

मृद व जलसंधारण विभागाच्या निकषानुसार रोजगार हमी योजनेच्या मापदंडानुसार रुपये ३५,०००/- पर्यंत १०० टक्के अनुदान देय राहील.

**१२. परसबाग:-**

शेतक-यांना परसबागेसाठी प्रति लाभार्थी रुपये २००/- प्रमाणे अनुदान देय राहील. यामध्ये भाजीपाल्याची पिके उदा.टोमॅटो ,कांदा,वांगी,भेडी इत्यादी समावेश राहील.

**१३. तुषार / ठिबक:-**

फलोत्पादन विभागाच्या तुषार व ठिबक सिंचन कार्यक्रमानुसार शेतकऱ्यांना सिंचन क्षेत्रात वाढ करण्यासाठी तुषार ठिबक संचाचा पुरवठा १०० टक्के प्रमाणात रु.२५०००/- प्रती हेक्टर अनुदान

देय राहील. संचाची खरेदी कृषि विभागाच्या मान्यता प्राप्त उत्पादकांकडून करावी व दर्जा आयएसआय प्रमाणीत असावा. संचाची तपासणी कृषि अधिकाऱ्यांनी (विघयो) केल्यावर अनुदान देय राहील. तुषार व ठिबक सिंचन संच पुरवठा फलोत्पादन विभागाच्या प्रती हेक्टर तांत्रिक व आर्थिक निकषांच्या आधारावर करण्यात यावी. तथापि अनुदान मर्यादा १०० टक्के राहील.

**अनुदानाची द्विरुक्ती :-**

या योजने अंतर्गत वरील १३ बाबीसाठी अनुदान देण्यात येते. तसेच इतर योजनामधुनही अनुदान देण्याची तरतुद आहे. तेव्हा लाभार्थीस एकाच बाब / घटकासाठी दोन योजने मधुन अनुदान मिळणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

***************************

## शासन निर्णय क्र.आऊयो २४१५/प्र.क्र.२१७/४अे, दिनांक ५ जून, २०१५ चे
## परिशिष्ठ-तीन
## दारिद्रय रेषेखालील आदिवासी उपयोजने अंतर्गत आदिवासी क्षेत्रातील/आदिवासी क्षेत्राबाहेरील शेतक-यांना कृषि विकासासाठी अर्थसहाय्य देण्याची योजना

(एक) **योजनेचे उदिष्ट**

दारिद्रय रेषेखालील आदिवासी शेतक-यांचे उत्पादन वाढवून त्यांची आर्थिक उन्नती करणे.

(दोन) **लक्षीत लाभार्थी**

या योजनेमध्ये आदिवासी शेतक-यांची निवड करताना खालील निकष राहतील.

१.जमीन धारणा:-

ज्या शेतक-यांजवळ त्यांच्या स्वत:च्या नावे ६ हेक्टर किंवा त्यापेक्षा कमी शेतजमीन अशा शेतक-यांची निवड करावी . जमीन धारणेचा दाखला ७/१२ , ८ अ मध्ये घेण्यात यावा.

२.जातीबाबतचा दाखला:-

लाभार्थी हा आदिवासी शेतकरी असला पहिजे. दारिद्र्य रेषेखालील ( बीपीएल) यादीमध्ये ज्या आदिवासी जमातीच्या व्यक्तीचे नाव असेल त्याला ग्रामसेवक / तलाठी/ गटविकास अधिकारी यांच्या सहीचे कागदपत्र ग्राहय धरले जातील. याच धर्तीवर अनुसुचित जाती उप योजनेंतर्गत दारिद्र्य रेषेखालील अनुसूचीत जमातीच्या व्यक्तीसाठी ज्या योजना असतील त्या योजनेकरीता समाजकल्याण विभागातील दिनांक ७ जानेवारी १९९७ च्या परिपत्रकातील सुचनांप्रमाणे पुन्हा तहसिलदार यांच्या सहीचा जातीचा दाखला आणणे आवश्यक राहणार नाही. दारिद्र्य रेषेखालील ( बीपीएल) यादीमध्ये नाव नसेल तर लाभार्थींनी संबधी प्रस्तूत योजनेतंर्गत लभार्थी निवडीच्या सविस्तर सूचना खालील प्रमाणे आहेत.

३.उत्पन्नाचा दाखला:-

ज्या लाभार्थी शेतकऱ्याचे सर्वमार्गांनी मिळणारे वार्षिक उतन्न रुपये २५,०००/- पर्यंत आहे अशा शेतक-यांना तहसिलदार यांचे कडुन उत्पन्नाचा दाखला देणे बंधनकारक राहील.

४. लाभार्थींची निवड करतांना खालील प्राधान्य क्रमाने करणे अनिर्वाय राहील:-

अ) ६.०० हेक्टर मर्यादेपर्यतचे द्रारिद्रय रेषेखालील शेतकरी प्रथम प्राधान्य

ब) दारिद्रय रेषेखालील लाभार्थी उपलब्ध होत नाही अशा वेळी जमिनधारणा खालीलप्रमाणे आहे असे लाभार्थी -

१) २.०० हे. पर्यत प्रथम प्राधान्य

२) २.०० हे. ते ४.०० हे. पर्यंत व्दितीय प्राधान्य

३) ४.०० हे. ते ६.०० हे. पर्यत तृतीय प्राधान्य

५. शेतकरी स्वत: शेती विकासाची कामे हाती घेण्यास उत्सुक असावा.

६. आदिवासी उप योजना (राज्य), आणि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील लाभार्थी निवडताना लाभार्थी हे खालील टक्केवारीनुसार कातकरी, कोलाम व माडिया गोड या आदिम जमातीचे असणे आवश्यक राहिल.

| | | |
|---|---|---|
| अ) कातकरी:- | पालघर, ठाणे, रायगड, रत्नागिरी, पुणे, नाशिक - | २०% |
| | इतर जिल्हे | १०% |
| ब) कोलाम :- | यवतमाळ, चंद्रपूर, नांदेड | २०% |
| | इतर जिल्हे | १०% |
| क) माडिया, गोड :-गडचिरोली | | २५% |

७. एका जिल्हयांअतर्गत (उदा. नंदूरबार) अत्यंत मागासलेल्या तालुक्यातील (उदा. अक्कलकुवा, धडगांव) जास्तीत जास्त लाभार्थी निवडण्यात यावेत. या धर्तीवर इतर तालुकानिहाय उद्दिष्ट आयुक्त (कृषि) यांनी तयार करुन त्यानुसार अंमलबजावणी करावी.

८. वनग्रामातील व वन जमिनीचा एक साली लीजधारकांपैकी ज्या लाभार्थीकडे ७/१२ उतारा नाही, परंतु त्यांच्याकडे जमिनीचा प्रत्यक्ष ताबा आहे व जिल्हाधिकाऱ्यांकडे अतिक्रमण नियमित करण्याबाबत व पट्टा देणेबाबत वन विभागातर्फे तयार करण्यात आलेल्या व केंद्र शासनाकडे शिफारस करण्यात आलेल्या आदिवासी शेतकऱ्यांना अवजारे, पंप, (तेल व डिझेल पंप) नालाबंडिग जमिनीचे सपाटीकरण, मृदसंधारण इत्यादी बाबींचा लाभ देण्यात यावा.

९. एकाच व्यक्तीला एकापेक्षा जास्त वेळा लाभ मिळणार नाही याची खातरजमा करुन योजनेतील घटकांचा लाभ द्यावा.

१०. लाभार्थीना लाभ देतेवेळी समूह विकास (Cluster approach) हा दृष्टीकोन समोर ठेवून मागास तालुक्यातील अत्यंत मागासलेल्या गावाची निवड करुन प्राधान्याने लाभ देण्यात यावा.

(तीन) योजनेच्या अंमलबजावणीचा कालावधी:-

या योजनांतर्गत निवड करण्यात येणा-या प्रत्येक लाभार्थीसाठी योजना राबविण्याचा कालावधी दोन वर्षाचा राहील. म्हणजेच लाभार्थीची निवड झालेले वर्ष व त्यांचे पुढील वर्ष अशा दोन वर्षाच्या कालावधीत लाभ देण्यात यावा.

**(चार) खर्चाचे निकष**:-

**उपरोक्त** योजने अंतर्गत विहीत बाबीवर करावयाच्या खर्चाचे निकष व त्याखालील मार्गदर्शक सूचना परिशिष्ट( एक ) मध्ये देण्यात मध्ये देण्यात आलेल्या आहेत.

**(पाच) प्रकल्प तयार करणे**

उपरोक्त योजनेंर्गत लाभार्थीची निवड करण्यासाठी तालुक्यातील गटविकास अधिका-यांने कृषि अधिकारी (विघयो) यांच्या मार्फत केलेल्या नमुन्यात पात्र लाभार्थीकडुन अर्ज मागवुन घ्यावेत.अशाप्रकारे तयार केलेली यादी गटविकास अधिका-यांने परिच्छेद (सहा) मध्ये नमुद केलेल्या जिल्हा निवड समितीला सादर करावी.

**(सहा) जिल्हा निवड समिती :-**

**या** योजनेंतर्गत गटविकास अधिका-यांनी तयार केलेल्या यादीमधुन लाभार्थीची निवड करण्यासाठी जिल्हास्तरावर एक जिल्हा समिती असेल या समीतीचे गठन पुढीलप्रमाणे असेल.

| | | |
|---|---|---|
| १) | **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. -** | **अध्यक्ष** |
| २) | **जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी** | **सदस्य** |

| | | |
|---|---|---|
| ३) | **कार्यकारी अभियंता, लघुसिंचन, जि.प.** | **सदस्य** |
| ४) | **भूजल सर्वेक्षण यंत्रणेचे जिल्हास्तरीय अधिकारी** | **सदस्य** |
| ५) | **जिल्हा प्रकल्प अधिकारी, आदिवासी विभाग** | **सदस्य** |
| ६) | **कृषि विकास अधिकारी, जि. प.** | **सदस्य सचिव** |

**(सात) लाभार्थीची निवड रद्द करणे:-**

लाभार्थींच्या निवडीचे अधिकार परिच्छेद (सहा) मध्ये नमूद केलेल्या समितीला राहतील ,परंतु खालील कारणांमुळे काही लाभार्थींची निवड रद्द करावयाची झाल्यास त्याचे अधिकार वरील जिल्हा स्तरीय समितीस राहतील.

(१) निवड केलेला शेतकरी मयत झाल्यास.

(२) निवड झालेला शेतक-यांने आपली सर्व शेतजमीन विकून तो भुमीहीन झाला असल्यास.

(३) निवड झालेला शेतकरी गाव सोडून इतरत्र कायम राहण्यास गेला असल्यास.

(४) निवड झालेला शेतकरी शेती विकास योजना हाती घेण्यास उत्सूक नसल्यास.

(५) निवड झालेल्या शेतक-यांने अर्थसहाय्य घेण्यास नकार दिल्यास.

(६) निवड झालेला शेतकरी योजनेखाली घेतलेल्या अनुदानाचा गैरवापर करत असल्यास .

(७) लाभार्थीची निवड शासनाने विहित केलेल्या निकषानुसार झाली नसल्याचे आढळून आल्यास.

वरिल परिस्थितीमुळे लाभार्थ्याची निवड रद्द झाल्यास नव्याने लाभधारकांची निवड करतांना खालील मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करावी.

(१) मयत झालेल्या लाभधारकाऐवजी शक्यतो वारसांची निवड करावी व शिल्लक राहिलेले अर्थसहाय्य त्यांना देण्यात यावे.

(२) लाभार्थींनी विक्री केलेल्या जमिनीवर अर्थसहाय्य दिले गेले असल्यास व जमिन विकत घेणारी व्यक्ती जर योजेने मध्ये निवडीस पात्र असेल अशा लाभार्थ्यीची निवड करून उर्वरित अर्थसहाय्याचा लाभ त्यास देण्यात यावा.

वरील कारणामुळे लाभार्थ्याची निवड रद्द करून त्याऐवजी विहित केलेल्या अटींची पूर्तता करणा-या दुस-या पात्र लाभार्थ्यांची विहित पध्दतीने निवड करावी.

**(आठ) अनुदानाचा गैरवापर करण्यास प्रतिबंध:-**

१)या योजेनेत निवड झालेल्या शेतक-यांनी अनुदानाचा गैरवापर केल्याचे आढळून आल्यास, अशा लाभार्थीकडून अनुदानाची वसुली करण्यात येवु नये, मात्र अशा लाभार्थीचे नाव काळ्या यादीत घालून सर्व संबधीत इतर विभागांना ही यादी पाठविण्यात यावी.व त्यांना या योजनेत कोणत्याही प्रकारचा लाभ देवू नये या बाबत दक्षता घेण्यात यावी.या योजनेंतर्गत निवड झालेला शेतकरी अर्थसहाय्याचा दुरुपयोग करणार नाही यासाठी योजना राबविणा-या अधिका-यांनी वेळोवेळी भेटी देवून तपासणी करावी व दिलेल्या प्रत्येक भेटीची नोंद त्यांच्या दौ-यांच्या दैनंदिनीत ठेवावी.

२)लाभार्थीची निवड शासनाने विहित केलेल्या निकषानुसार झाली नसल्याचे आढळून आल्यास अशा चुकीच्या निवडीबाबत तसेच लाभधारकाला देण्यात येणा-या अनुदानाच्या रक्कमांबाबत

काही गैरव्यवहार आढळून आल्यास त्याची जबाबदारी निश्चित करून संबधीत अधिका-यांकडून लाभार्थ्यांना दिलेल्या अर्थसहाय्याची वसूली करण्यात येईल.

**(नऊ) अनुदानाचे स्वरुप / पध्दती:-** या योजने अंतर्गत निवड केलेल्या लाभार्थ्यांना देय अनुदानाची रक्कम रोख स्वरुपात न देता वस्तु रुपामध्ये (योजनेतील मंजुर घटक) द्यावयाची आहे व जेथे आवश्यक असेल अशा लाभार्थींचे बॅकेत खाते उघडून अनुदानाची रक्कम लाभार्थ्यांच्या खात्यात जमा करण्यात यावी.

या योजनेमध्ये तेरा बांबीवर अर्थसहाय्य देण्यात येत असले तरी या सर्वच बांबीचा लाभ लाभार्थ्यास आवश्यक आहे असे अभिप्रेत नाही. मात्र कोणत्या बाबींची लाभार्थ्यास निकड आहे हे लाभार्थ्यास विचारून / निश्चित करून त्याप्रमाणे लाभ देण्यात यावा. या योजनेंतर्गत जे लाभार्थी नविन विहिर या घटकाचा लाभ घेणार आहेत, त्यांच्यासाठी अनुदानाची मर्यादा रुपये ७०,००० ते रु.१, ००,००० इतकी राहील.(भुजल संर्वेक्षणाच्या नुसार विविध जिल्हयासाठी ठरविण्यात आलेल्या भुस्तरीय खर्चाच्या मापदंडाच्या अधिन राहून देय राहील.) परंतू जे लाभार्थी नवीन विहीर या घटकाचा लाभ घेणार नाहीत त्यांना अनुदानाची मर्यादा रु.५०,०००/-इतकी राहील.

**(दहा) लेखा पध्दती:-**

**लाभार्थ्यांना** देण्यात येणा-या बाबवार अर्थसहाय्याची योजना निहाय, बाब निहाय व लाभार्थी निहाय नोंद करण्याकरिता पंचायत समिती स्तरावर रजिस्टर ठेवण्यात यावे व त्यामध्ये लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या अनुदानाची बाब निहाय नोंद ठेवण्यात यावी.तसेच कृषि विकास अधिकारी जिल्हा परिषद स्तरावर लाभार्थ्यांना देय व देण्यात आलेल्या लाभ घटकांची नोंद नोंदवहीत ठेवणे अत्यावश्यक आहे. व या नोंदवहीची तपासणी जिल्हा कृषि अधिकारी, (विघयो) यांनी साक्षांकित करणे आवश्यक राहील.पंचायत समिती स्तरावरील नोंदवहया व अभिलेख जिल्हा कृषि अधिकारी (विघयो) यांनी तपासुन तशी नोंद नोंदवहीमध्ये घेण्यात यावी. कृषि विकास अधिकारी यांनीही पंचायत समिती स्तरावरील व जिल्हा परिषद स्तरावरील सदर नोंदवहीची तपासणी करणे आवश्यक राहील. सदर नोंदवहया व अभिलेख विभागीय कृषि सह संचालक , कृषि आयुक्तालय स्तरावरील अधिका-यांना त्यांच्या दौ-यांच्या वेळी तपासणी साठी उपलब्ध करुन दयाव्यात. लाभार्थ्यांना दिलेल्या अर्थसहायाची लाभार्थी स्तरावर नोंद ठेवण्यासाठी लाभार्थीना नोंद पुस्तिका देण्यात यावी. या नोंद पुस्तिकेत दिलेल्या अर्थसहाय्याची नोंद संबधीत अधिका-यांनी वेळोवेळी न चुकता करावी.

**(अकरा) पतपुरवठा आराखडा तयार करणे:-**

या योजनेमध्ये ज्या बाबींसाठी १०० टक्के अनुदानाची रक्कम उपलब्ध आहे अशा बाबीकरिता उर्वरित रक्कम ही लाभार्थीनी वित्त पुरवठा करणाऱ्या संस्थांमार्फत किंवा स्वत: उभी करणे आवश्यक आहे. यासाठी लाभार्थीची निवड लक्षात घेऊन प्रतिवर्षी बाबनिहाय आराखडा तयार करुन जिल्हा अग्रणी बँकेने ठरवून दिलेल्या प्रपत्रात जिल्हा अग्रणी बॅकेकडे सादर करावा. तसेच मंजूर होण्याकरिता येणाऱ्या त्रुटीची वेळीच पूर्तता करावी. लाभार्थी ज्या गटात आहे त्या गटात आय. आर.डी. पी. व इतर योजनेत कर्ज मेळावा आयोजित करण्यात येतात त्या मेळाव्यात संबंधित जिल्हा कृषि अधिकारी (विघयो) यांनी हजर राहून सर्व प्रकरणे मंजूर करुन घेण्याबाबतची कार्यवाही करावी.

**(बारा) खर्चाचे नियोजन:-**

प्रत्येक लाभार्थीची आर्थिक स्थिती, त्यांची एकूण जमिन व इतर साधनांची उपलब्धता विचारात घेवून त्या लाभार्थ्यास कोणकोणत्या बाबींवर अर्थसहाय्य द्यावयाचे आहे. याबाबतचा प्रारुप आराखडा लाभार्थी बरोबर चर्चा करून तयार करावा. अशा प्रकारचा आराखडा तालुका स्तरावर कृषि अधिकारी (विघयो) व जिल्हास्तरावर संबधीत जिल्हा कृषि अधिकारी (विघयो) यांनी तयार करावा व त्याप्रमाणे दोन वित्तीय वर्षात बाबवार खर्चाचे नियोजन करण्यात यावे.

**(तेरा) मासिक प्रगती अहवाल:-**

योजनेचा मासिक प्रगती अहवाल विहित केलेल्या प्रपत्रात प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत कृषि आयुक्तालयाकडे पाठविण्यात यावा व कृषि आयुक्तालयाने एकत्रित अहवाल प्रत्येक महिन्याच्या २० तारखेपर्यन्त शासनास सादर करावा.

**(चौदा) प्रसिध्दी**:- या योजनेची माहिती सामान्य लोकांना व्हावी या दृष्टीने कृषि आयुक्तालयातील कृषि माहीती अधिकारी तसेच विभागीय कृषि सह संचालक यांनी तसेच जिल्हा परिषद स्तरावर कृषि विकास अधिकारी यांनी या योजनेस जास्तीत जात प्रसिध्दी द्यावी. त्यासाठी त्यांनी त्यांच्या क्षेत्रातील स्वयंसेवीसंस्थाशी संपर्क साधुन त्यांच्यामार्फत देखील प्रसिध्दी द्यावी. या योजनेची माहिती पंचायत समिती स्तरावर गट विकास अधिकारी, कृषि अधिकारी (विघयो) तसेच जिल्हास्तरावर जिल्हा परिषदेतील जिल्हा कृषि अधिकारी (विघयो) यांच्याकडे उपलब्ध राहील.

*********************